तंत्रशिक्षणाचा दर्जा सुधार कार्यक्रमात सहभागी संस्थांना अनुदान वितरीत करणे बाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः WBP- २९११/(९१/१४)/तांशि-२**

मंत्रालय विस्तार भवन
मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १४ ऑगस्ट,२०१४

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक- TEQIP-२०१०/(०२/१०)/ तांशि-२, दि. ३१ मे २०१२
२) मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार, यांचे पत्र क्र. F. No. १६-१३/२०१४ - TS VII , दि.२४ जून, २०१४
३) मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार, यांचे पत्र क्र. F. No. १६-१३/२०१४ - TS VII , दि.२४ जून, २०१४.
४) मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार, यांचे पत्र क्र. F. No. १६-१३/२०१४ - TS VII , दि.२४ जून, २०१४.
५) संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र. डीटीई / एसपीएफयू /फायनान्स /२०१४-१५/११६, दि. २७ जून, २०१४
६) तंत्र शिक्षणाचा दर्जा सुधार कार्यक्रम राबविण्यासाठी केंद्र शासनाद्वारा निर्धारीत Project Implementation Plan.

**प्रस्तावना -**

जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने केंद्र शासनाव्दारा देशांतर्गत तंत्र शिक्षणाचा दर्जा सुधार कार्यक्रम राबविण्यात येत आहे. उपरोक्त संदर्भ - १ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सदर कार्यक्रमात महाराष्ट्र राज्याच्या सहभागास मंत्रीमंडळाची मान्यता प्राप्त झाली आहे. त्यानुसार केंद्र शासनाने सदर कार्यक्रमात सहभागी होण्यासाठी राज्याची निवड केली असून निवड प्रक्रियेच्या पहिल्या टप्प्यात राज्यातील १६ संस्था व दुस-या टप्प्यात २ संस्था अशा एकूण १८ संस्थांची निवड केली आहे. सदर कार्यक्रमाच्या उप विभाग - १.१ व १.२ मध्ये सहभागी शासकीय, अशासकीय अनुदानित संस्थांना तथा कार्यक्रमाच्या उप विभाग - १.२ मध्ये सहभागी अशासकीय विना अनुदानित संस्थांना देय आर्थिक सहाय्यापैकी ७५% आर्थिक सहाय्य केंद्र शासनाद्वारा व २५% आर्थिक सहाय्य राज्य शासनाद्वारा उपलब्ध करण्यात येणार आहे. सदर कार्यक्रमाच्या उप विभाग - १.२. मधिल तरतूदीनुसार या कार्यक्रमाच्या उप विभाग १.२ मध्ये सहभागी राज्यातील संस्थांना केंद्र शासनाकडून देय अनुदानाचा हप्ता उपरोक्त संदर्भ - २, ३ व ४ अन्वये प्राप्त झाला असून

त्यात राज्य शासनाचा हिस्सा योग्य प्रमाणात समाविष्ट करुन संबंधित संस्थाना अदा करण्यासाठी तंत्र शिक्षण संचालनालयाच्या सुपूर्द करण्याची बाब राज्य शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय</u>-**

तंत्रशिक्षणाच्या दर्जा सुधार कार्यक्रमांतर्गत उपरोक्त संदर्भ - २, ३ व ४ मधिल केंद्रशासनाच्या पत्रान्वये या कार्यक्रमात सहभागी झालेल्या संस्थाना रु. १२७५.०० लाखाचे अनुदान वितरीत झाले असून त्यात राज्यशासनाचा हिस्सा रु.४२५.०० लाख समाविष्ट करुन एकुण रु. १७००.०० लाख एवढ्या रक्कमेचे अनुदान संबंधित संस्थांना अदा करण्यासाठी तंत्र शिक्षण संचालनालयास वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

संस्थांना वितरित करावयाचा निधी संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, म.रा., मुंबई यांचेमार्फत अधिदान व लेखा कार्यालयात देयक सादर करुन आहरित करण्यात यावा.

सदर कार्यवाहीकरिता संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, म.रा., मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व लेखा अधिकारी, तंत्र शिक्षण संचालनालय, म.रा., मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर अनुदान कार्यक्रमांतर्गत सहभागी संस्थाना निम्न तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे उपलब्ध करण्यासाठी तंत्र शिक्षण संचालनालयाने या कार्यक्रमासाठी निर्धारीत कार्यपध्दतीचा वापर करावा.

| अ.क्र. | कार्यक्रमाचा उपविभाग | संस्थेचे नाव | केंद्र शासनाचा हिस्सा रु. लाखात | राज्य शासनाचा हिस्सा रु. लाखात | एकूण रु. लाखात |
|---|---|---|---|---|---|
| १ | १.२ | अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे | १८७.५० | ६२.५० | २५०.०० |
| २ | १.२ | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, औरंगाबाद | १८७.५० | ६२.५० | २५०.०० |
| ३ | १.२ | रसायन तंत्रज्ञान संस्था, मुंबई | ३००.०० | १००.०० | ४००.०० |
| ४ | १.२ | वीरमाता जिजाबाई तंत्रज्ञान संस्था, मुंबई | १८७.५० | ६२.५० | २५०.०० |
| ५ | १.२ | श्री. गुरु गोविंद सिंगजी इन्स्टिटयूट ऑफ इंजिनिअरिंग ॲण्ड टेक्नॉलॉजी, नांदेड | १८७.५० | ६२.५० | २५०.०० |
| ६ | १.२ | वालचंद कॉलेज ऑफ इंजिनिअरिंग, सांगली | २२५.०० | ७५.०० | ३००.०० |
| | | **एकूण** | **१२७५.००** | **४२५.००** | **१७००.००** |

सदर आदेशान्वये वितरीत करावयाचे अनुदानासाठी, या कार्यक्रमांतर्गत आर्थिक वर्ष सन २०१४-१५ मध्ये, तंत्रशिक्षणाच्या दर्जा सुधार कार्यक्रमासाठी निम्न नमूद लेखाशीर्षाखाली राज्य शासनाच्या हिस्स्यासाठी रु. २२५०.०० लाख ( अर्थसंकल्पात करण्यात आलेली तरतूद रु.१७५० लाख व पावसाळी अधिवेशन, २०१४ मध्ये मंजूर करण्यात आलेली तरतूद रु.५०० लाख ) व केंद्रशासनाच्या हिस्स्यासाठी रु. १०५००.०० लाख अशी एकूण रु. १२७५०.०० लाखाची तरतूद करण्यात आली आहे. निम्न तक्त्यात नमूद लेखाशीर्षाखाली राज्य शासनाच्या व केंद्रशासनाच्या हिस्स्यासाठी करण्यात आलेल्या अनुक्रमे रु. २२५०.०० लाख व रु. १०५००.०० लाख या आर्थिक तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावे.

| अ.क्र. | अनुदानाचा हिस्सा | लेखाशिर्ष | एकुण आर्थिक तरतूद(रु. लाखात) |
|---|---|---|---|
| १ | राज्य शासन | २२०३, तंत्रशिक्षण,<br>११२ (००)(२१) जागतिक बँक सहाय्यित प्रकल्प तंत्रशिक्षणाचा दर्जा सुधारण्याचा कार्यक्रम (राज्य हिस्सा) (२२०३ ३१४८)<br>३१ सहाय्यक अनुदान, मागणी डब्ल्यू - ३ | २२५०.०० |
| २ | केंद्र शासन | २२०३, तंत्रशिक्षण,<br>११२ (००)(२२) जागतिक बँक सहाय्यित प्रकल्प तंत्रशिक्षणाचा दर्जा सुधारण्याचा कार्यक्रम (केंद्र हिस्सा) (२२०३ ३१५७)<br>३१ सहाय्यक अनुदान, मागणी - डब्ल्यू - ३ | १०५००.०० |

सदर आदेशान्वये उपरोक्त अनुदानाचा विनियोग करताना संबंधित संस्थांकडून संदर्भ -६ मध्ये नमूद Project Implementation Plan तथा संदर्भ - २, ३ व ४ मध्ये नमूद कार्यपध्दती व विहीत अटी व शर्तीचे पालन करणे आवश्यक राहील.

उपरोक्त सहाय्यक अनुदान हे ज्या कामासाठी वितरीत केलेले आहे ते त्या कामासाठीच वापरण्यात यावे. तसेच तपशीलवार शिर्षाखालील उर्वरीत तरतूद निधी वितरण करण्यासाठी वित्त विभागास अपेक्षित असलेली माहिती व पूर्वी वितरीत केलेल्या रक्कमांचे विनियोग प्रमाणपत्रे तंत्रशिक्षण संचालनालयाने तात्काळ सादर करावीत.

सदर आदेश नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र. अनुक्रमे २५९ /१४७१, दि.१५/७/२०१४, तथा /व्यय-५, दि.१३/८/२०१४ व ७६/अर्थोपाय/२०१४-१५, दि.२५/७/२०१४ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१४१५०२१४०१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AVHAD PRAKASH B

Digitally signed by AVHAD PRAKASH B
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=AVHAD PRAKASH B
Date: 2014.08.16 14:59:58 +05'30'

**(प्रकाश भास्करराव आव्हाड)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
३) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ५ प्रति
४) संचालक/ प्राचार्य, सर्व संबंधित संस्था (संचालक, तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
५) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
६) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
७) अवर सचिव (सांशि -१), उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
८) निवड नस्ती - तांशि -२